**अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांचे मुल्यांकन (Accreditation) व पुनर्मुल्यांकन (Reaccreditation ) करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१०/(२०/१०)/विशि-३
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ८ ऑक्टोंबर , २०१०

वाचा :

१) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००१/(२१७/०१)/विशि-३, दि.२५ ऑक्टोबर, २००१
२) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००१/(७९/०१)/विशि-३, दि.२ नोव्हेंबर, २००१
३) दि.१५.११.२००८ रोजी सर्व विद्यापीठांच्या कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत घेण्यात आलेला निर्णय. तसेच दि.२०.३.२००९ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेला निर्णय.
४) याचिका क्र.२२१६/२००६ वरील मा.उच्च न्यायालयाचे दि.३.१२.२००८ चे आदेश

**प्रस्तावना :-** राज्याची प्रगती होण्यासाठी तसेच जागतिकीकरणाच्या स्पर्धेमध्ये टिकून राहण्यासाठी नागरिकांस दर्जेदार शिक्षण मिळणे आवश्यक आहे. भविष्यातील सुज्ञ नागरिक घडविण्यामध्ये उच्च शिक्षणाचा मोलाचा वाटा आहे. त्यामुळे उच्च व तंत्रशिक्षणाचा दर्जा उंचावणे व त्याची गुणवत्ता वाढविणे अत्यावश्यक आहे. या विभागांतर्गत १३ अकृषि विद्यापीठे निरनिराळया ४ अधिनियमातील तरतूदी नुसार कार्यरत आहेत. या अधिनियमातील तरतुदीनुसार राज्यातील शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी आवश्यक त्या सर्व उपाययोजना करण्याची सर्व जबाबदारी विद्यापीठांचे कुलगुरु व त्यांचे सर्व अधिकारी यांची असते. उच्च शिक्षणाचा दर्जा उंचावण्यासाठी विद्यापीठ अनुदान आयोग, अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, राष्ट्रीय अध्यापक शिक्षण परिषद,इत्यादी प्राधिकरणांकडून सुध्दा वेळोवेळी निदेश देण्यात येतात.

२. तथापि, गेल्या काही वर्षापासून असे निदर्शनास आले आहे की, एका बाजुला जागतिक स्तरावर उच्च शिक्षणाचा दर्जा वाढत असून दुसऱ्या बाजुला राज्यातील उच्च शिक्षणाचा दर्जा मात्र घसरत आहे. याबाबत समाजातील विविध घटक व तज्ञांकडून व तसेच मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखालील कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (जे.बी.व्ही.सी.) वेळोवेळी चिंता व्यक्त करण्यात आली आहे. त्याचप्रमाणे या संदर्भात मा.न्यायालयानेही वेगवेगळया याचिकांमध्ये निर्णय देतांना चिंता व्यक्त केली आहे.

३. मा.कुलपती यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कुलगुरुंच्या संयुक्त बैठकीत (J.B.V.C.) व मा. उच्च न्यायालयाने निरनिराळया याचिकांमध्ये निर्णय देताना उच्च शिक्षणाचा दर्जा वाढविण्यासाठी व शिक्षणाच्या जागतिकीकरणाच्या स्पर्धेत राज्यातील विद्यार्थी टिकून रहावेत यासाठी योग्य ती पावले उचलण्यासाठी शासनाला व विद्यापीठांना आदेशित केलेले आहे.

४. शिक्षणाच्या गुणवत्तेमध्ये अपेक्षेप्रमाणे वाढ न होण्याच्या व शिक्षण क्षेत्रामध्ये घसरण होण्याच्या अनेक कारणांपैकी **राज्यातील अकृषी विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांनी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून मुल्यांकन (Accreditation) व पुनर्मुल्यांकन (Reaccreditation ) करुन न घेणे** हे एक मुख्य कारण असल्याचे प्रकर्षाने दिसून आले आहे. महाराष्ट्र राज्यात सुमारे फक्त २५% शिक्षण संस्थांनीच मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन केलेले आहे. उर्वरीत ७५% संस्थांनी अद्यापही मुल्यांकनाचे प्रस्ताव संबंधीत सक्षम प्राधिकरणाकडे पाठविलेले नाही. सध्या मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन करणे ही बाब बंधनकारक करण्यांत येत आहे.

५. विद्यापीठे व महाविद्यालयांनी मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन करुन घेणे हे आवश्यक असल्याचे धोरण केंद्रशासनामार्फत राबविण्यात येणार आहे. भारतीय संविधानाच्या सातव्या अनुसूचीतील समवर्ती सूचीमध्ये शिक्षण हा विषय समाविष्ट असल्यामुळे या विषयावर आवश्यक ते धोरण ठरविण्याचे अधिकार राज्य शासन व केंद्रशासनास आहेत. **या संदर्भात संपूर्ण देशातील उच्च शिक्षणाच्या गुणवत्तेचे जतन व संवर्धन व्हावे या करीता विद्यापीठ अनुदान आयोगाने देशातील सर्व विद्यापीठे व महाविद्यालयांनी नॅशनल ॲसेसमेंट व ॲक्रीडीटेशन कॉन्सील बँगलोर कडून डिसेंबर, २००३ अखेरपर्यन्त ॲसेसमेंट व ॲक्रीडीटीशेन करुन घेण्याचे निर्देश दिलेले आहेत. तसेच जी महाविद्यालये डिसेबर,२००३ पर्यन्त नॅककडे मुल्यांकन व प्रमाणिकरणाकरीता अर्ज करणांर नाहीत किंवा या प्रक्रियेत सहभागी होणार नाहीत अशा महाविद्यालयांना विद्यापीठ अनुदान आयोगा मार्फत विकासात्मक अनुदान दिले जाणार नसल्याचे आयोगाने स्पष्ट केले आहे. राज्यशासनाकडून सन २००१ पासून विना अनुदानीत / कायम विनाअनुदानीत तत्वावर राज्यातील खाजगी शिक्षण संस्थांच्या माध्यमातून विविध शाखेमध्ये शिक्षणाचा प्रसार होण्यासाठी महाविद्यालयांना मंजूरी देण्याचे धोरण अवलंबिले आहे. त्यामुळे अशा शैक्षणिक संस्थांना व खाजगी महाविद्यालयांना विद्यापीठ अनुदान आयोगातर्फे विकासात्मक अनुदान मिळण्याच्या दृष्टीने राज्य शासनाने मुल्यांकन व प्रमाणिकरण करण्याच्या दृष्टीने सर्व महाविद्यालयांना मार्गदर्शन व्हावे याकरीता विशेष पुढाकार घेऊन तत्कालीन मंत्री (उ.व तं.शि.) यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय समन्वय समिती स्थापन केली होती. या व्यतिरिक्त डॉ.जनार्दन वाघमारे, माजी कुलगुरु यांच्या अध्यक्षतेखाली मुल्यांकन व प्रमाणिकरणाच्या कामात नियंत्रण / देखरेख ठेवण्याच्या दृष्टीने एक विशेष कार्यगट स्थापन करण्यात आला होता. त्यामुळे**

**राज्यातील ५ वर्षाहून अधिक काळ कार्यरत असणाऱ्या महाविद्यालयांनी मुल्यांकन व प्रमाणिकरणाच्या प्रक्रियेत सहभागी व्हावे असे निश्चित करण्यात आले होते. त्यासाठी राज्यात विद्यापीठनिहाय विभागीय समित्यांची स्थापना सुध्दा करण्यात आली होती.**

६. मा.राज्यपाल महोदयांनी दि.११.११.२००९ रोजी विधानमंडळामध्ये केलेल्या अभिभाषणात विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालयांनी मुल्यांकन (Accreditation) व पुनर्मुल्यांकन (Reaccreditation ) करणे बंधनकारक राहील असे घोषित केले आहे.

७. वरील उणीवा दूर करण्यासाठी व मा.उच्च न्यायालयाच्या आदेश, केंद्रशासनाचे धोरण व मा.राज्यपाल महोदयांची घोषणा, इत्यादींची अंमलबजावणी करण्यासाठी शासन पुढीलप्रमाणे आदेश पारीत करीत आहे:-

**<u>शासन निर्णय</u>**

८. **आता सर्व अकृषी विद्यापीठे व संलग्नित सर्व पात्र महाविद्यालयांना मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन करणे अनिवार्य असून त्याबाबत खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत -**

(i) ज्या अकृषि विद्यापीठांनी व त्यांच्या अधिक्षेत्रातील सन २००१ पूर्वी मंजूर करण्यात आलेल्या सर्व संलग्नित पात्र महाविद्यालयांनी तसेच विना अनुदानीत महाविद्यालयांनी ५ वर्षाहून अधिक काळापर्यन्त कार्यरत असणाऱ्या महाविद्यालयांनी / संस्थांनी मुल्यांकन व पुनर्मुल्यांकनाची प्रक्रिया पूर्ण करणे अपेक्षित होते. तथापि **ज्या शैक्षणिक संस्थांनी / महाविद्यालयांनी अद्यापपर्यन्त मुल्यांकन वा पुनर्मुल्यांकन करुन घेतलेले नाही त्यांनी खालीलप्रमाणे निश्चित केलेल्या तीन टप्प्यांचा (Three Stages) अवलंब करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यांत यावी.**

(अ) शासनाच्या नवीन धोरणानुसार दि.३१ मार्च,२००१ पूर्वी विविध खाजगी शैक्षणिक संस्थांना बहुशाखीय महाविद्यालये अनुदान तत्वावर मंजूर करण्यात आली आहेत अशा महाविद्यालयांनी / संस्थांनी संबंधीत प्राधिकरणाकडून उदा.NAAC, NBA मुल्यांकन व पुनर्मुल्यांकन करुन घेणे व त्यामध्ये अपेक्षित वर्गवारी प्राप्त करुन घेणे या आदेशान्वये **अनिवार्य करण्यात येत आहे.** तद्वतच ज्या खाजगी शैक्षणिक संस्थांना दि.३१ मार्च, २००१ नंतर अनुदानीत / विनाअनुदानीत व कायम विना अनुदानीत तत्वावर मंजूर करण्यांत आलेल्या विविध शाखीय महाविद्यालयांचे / संस्थांचे मुल्यांकन अद्यापपर्यन्त केले नसल्यास अशा संस्थांनी सुध्दा १०० टक्के महाविद्यालयाचे / संस्थांचे

मुल्यांकन ( Accreditation ) करुन घेणे आवश्यक आहे. तद्वतच ज्या महाविद्यालयानी / संस्थांनी मुल्यांकन करुन घेतले असल्यास, त्यांनी पुनर्मुल्यांकन ( Re-accreditation ) करुन घेणे आवश्यक आहे.

(ब) ज्या खाजगी शिक्षण संस्थांना १ एप्रिल, २००१ नंतर मंजूर करण्यांत आलेल्या विनाअनुदानीत व कायम विना अनुदानीत तत्वावरील ५० टक्के एवढी महाविद्यालये / संस्थांचे मुल्यांकन दि.३१ मार्च, २००७ अखेर पर्यन्त करुन घेणे आवश्यक होते. तथापि, अशा मंजूर झालेल्या महाविद्यालये / संस्थांचे मुल्यांकन (Accreditation) / पुनर्मुल्यांकन (Re-accreditation ) करुन घेण्यात आले नसल्यास त्यांसंस्थांनी त्यांचें प्रस्ताव संबंधीत प्राधिकरणाकडे अद्याप पर्यप्त पाठविले नसतील तर त्यांचे प्रस्ताव दि.३० नोव्हेंबर, २०१० पर्यनत पाठविण्याची व्यवस्था करावी.

(क) ज्या खाजगी शिक्षण संस्थांना दि.१ एप्रिल, २००७ नंतर मंजूर करण्यात आलेल्या विना अनुदानीत व कायम विना अनुदानीत तत्वावरील महाविद्यालये / संस्था यांचे मुल्यांकन (Accreditation) पूर्ण करण्याच्या दृष्टीने दखल घेऊन त्याप्रमाणे विहीत मुदतीत दि.३१ मार्च, २०११ पर्यन्त आवश्यक ती कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी.

(ii) सर्व पात्र अकृषी विद्यापीठे व संलग्नीत महाविद्यालये / संस्था यांनी मुल्यांकन व पुनर्मुल्यांकनाचे प्रस्ताव जर अद्यापपर्यन्त संबंधीत प्राधिकरणाकडे पाठविले नसतील तर त्यांनी त्यांचे प्रस्ताव **दि.३० नोव्हेंबर, २०१० पर्यन्त** संबंधित प्राधिकरणाकडे पाठवावेत.

(iii) सन २००८-०९ व २००९-२०१० व त्यापुढील शैक्षणिक वर्षानंतर पात्र ठरणाऱ्या विद्यापीठे व संलग्नीत महाविद्यालयांनी / संस्थांनी त्यांचे मुल्यांकन व पुनर्मुल्यांकनाचे प्रस्ताव ते ज्या वर्षी पात्र ठरतील त्यांनी त्या शैक्षणिक वर्षातील **दि.३१ मार्च** अखेर पर्यन्त संबंधीत प्राधिकरणाकडे पाठविणे बंधनकारक राहील.

६. **विद्यापीठांची जबाबदारी -**

(i) सर्व पात्र अनुदानीत / विना अनुदानीत व कायम विना अनुदानीत महाविद्यालये / संस्थांचे मुल्यांकन (Accreditation) व पुनर्मुल्यांकनाचे (Re-accreditation) प्रस्ताव वरील परिच्छेदामध्ये नमूद केल्याप्रमाणे सक्षम प्राधिकरणांकडे विहीत मुदतीत सादर करण्यांत येतील व हे तपासण्याची सर्व जबाबदारी विद्यापीठाची राहील.

(ii) विद्यापीठाने वरील बाबींचा तिमाही (Quartarly) आढावा घेऊन तद्संबंधीचा अहवाल त्याच **महिन्याच्या दि.१५ तारखेपर्यन्त** संबंधीत विभागीय सहसंचालक व संचालक (उच्च शिक्षण / तंत्रशिक्षण) यांच्याकडे सादर करावा.

(iii) जी महाविद्यालये /संस्था अशाप्रकारचा मुल्यांकनाचा / पुनर्मुल्यांकनाचा प्रस्ताव सक्षम प्राधिकरणाकडे विहीत मुदतीत पाठविणार नाही अशा **महाविद्यालयाच्या विरुध्द संबंधीत विद्यापीठाने असंलग्निकरण, इ.बाबत** कारवाई करावी.

७. **संचालक / सहसंचालक यांची जबाबदारी :**

(i) विद्यापीठे व संलग्नित महाविद्यालय / संस्थाकडून सदर शासन निर्णयाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी सर्व विभागीय सहसंचालक, उच्चशिक्षण / तंत्रशिक्षण त्याचप्रमाणे संचालक, उच्च शिक्षण / तंत्रशिक्षण यांनी **योग्य तो पाठपुरावा** करुन **त्रैमासिक अहवाल** शासनास सादर करावा.

(ii) सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्यास जी विद्यापीठे / महाविद्यालये व संस्था अपयशी ठरतील, त्या विद्यापीठांविरुध्द शासन योग्य ती कारवाई करेल.

८. हा शासन निर्णय राज्यातील सर्व उच्च शिक्षण / अभियांत्रिकी / अध्यापकीय / औषधनिर्माणशास्त्र / व्यवस्थापनशास्त्र; इ.व्यावसायिक पदवी / पदव्युत्तर सर्व अभ्यासक्रमाच्या महाविद्यालयांना लागू राहील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८(४), कवी कुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय अधिनियम १९९७ मधील कलम ८(४), डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ अधिनियम, १९८९ व यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ अधिनियम, १९८९ मधील तरतुदी नुसार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेताक क्रमांक २०१०१००८१९०५२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने

( रा.गो.जाधव )
शासनाचे उपसचिव

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा.कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
३) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा.सचिव , उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक

५) सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
६) मा. मंत्री ,(उ.व तं.शि), यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री, (उ.व तं. शि.), यांचे खाजगी सचिव.
८) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१०) सर्व सहसंचालक, उच्च शिक्षण व तंत्रशिक्षण
११) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
१२) सर्व  अकृषि विद्यापीठांचे संचालक, बी.सी.यु.डी.
१३) सर्व कार्यासन अधिकारी, उच्च व तंत्रशिक्षण विभाग
१४) निवड धारिका विशि-३